

# बिशनचंद कपूरची कहाणी

## पुनर्जन्म संकल्पनेवरील

## प्रा अद्वयानंद गळतगे सरांचे लेखन





# डार्विनचा उत्क्रांतीवादी सिद्धांत खरा आहे काय?-

## प्रकरण ७ - पुनर्जन्माची लक्षणे

## E Book 172

# बिशनचंदची कपूर पुनर्जन्मकथा

जन्मला बरेलीत- १९२२.
पुर्वजन्म- (लक्ष्मीनारायण) पीलिभीतमधील मोहल्लागंज.
तनकपूरला नोकरी
नैकोठ - पद्माची भेट
शहाजहानपुरला - काही काळ नोकरी



# पुनर्जन्माची खालील सात लक्षणे पुनर्जन्म सत्य असल्याचे सिध्द करतात

❖ यापैकी काही लक्षणे प्रत्येक पुनर्जन्म प्रकरणात हमखास आढळून येतात, ज्यामुळे ते प्रकरण सत्य सिध्द होते. पुनर्जन्माची ही सात लक्षणे अशी :

❖ (१) वडिलधाऱ्या माणसाने पुनर्जन्म घेत असल्याचे भाकीत करणे:

❖ (२) पुनर्जन्म घेत असल्याचे स्वप्नात येऊन सांगणे:

❖ (३) बाळात जन्मखुणा व जन्मदोष आढळणे:

❖ (४) बालकाने मागच्या जन्मातील गोष्टींची अनुभवात्मक विधाने करणे:

❖ (५) मागच्या जन्मातील कुटुंबातील व्यक्तीना प्रत्यक्ष भेटीत ओळखणे:

❖ (६) मागच्या जन्मातील व्यक्तीचा मृत्यू हिंसक रीतीने झाल्याच्या आठवणींचे प्रमाण जास्त असणे:

❖ (७) पूर्वजन्म आठवणाऱ्या मुलाची नवीन कुटुंबातील वागणुक असामान्य असणे:

# बिशनचंद कपूरची सध्याच्या जन्मातील ओळख

❖ बिशनचंद याचा जन्म बी. रामगुलाम कपूर व कुंतिदेवी कपूर यांच्या पोटी ७ फेब्रुवारी१९२२ रोजी बरेली (उत्तरप्रदेश) येथे झाला.

❖ त्याला कमला (जन्म १९०८) व बिपनचंद (जन्म १९१४) ही दोन मोठी भावंडे होती. बी. रामगुलाम हे रेल्वे खात्यात कारकुनाची नोकरी करीत होते.

❖ बिशनचंद केवळ दहा महिन्याचा असताना ' पिल्वित' हा शब्द वारंवार उच्चारू लागला. अडीच वर्षानंतर बोलायला शिकल्यानंतर, 'माझे गाव पिलिभीत.

❖ माझे नाव लक्ष्मीनारायण. माझ्या वडिलांचे नाव हरनारायण. ते मोठे जमीनदार होते.' अशा रीतीच्या पूर्वजन्माविषयीच्या गोष्टी तो बोलू लागला.



# के. के. एन. सहाय यांचे पुनर्जन्म संशोधन

- रामगुलाम यांनी आपल्या एका मित्राला आपला मुलगा मागच्या जन्माच्या गोष्टी बोलत असल्याचे सांगितले.
- त्यांच्या मित्राने के. के. एन. सहाय या पुनर्जन्म संशोधकास ही गोष्ट सांगितली. लागलीच के. के. एन. सहाय, बी. रामगुलाम यांच्या घरी येऊन बिशनचंदच्या मागच्या जन्माबद्दल तो सांगत असलेल्या सर्व गोष्टींची/विधानांची नोंद करून घेतली व त्यांची खातरजमा करायासाठी त्याला पिलिभीत या शहराला घेऊन जाण्यासाठी बी. रामगुलाम यांचे मन वळवले .
- त्याप्रमाणे के. के. एन. सहाय, बी. रामगुलाम व त्यांचा थोरला मुलगा बिपनचंद असे तिघेजण १ऑगष्ट १९२६ रोजी साडेपाच वर्षाच्या बिशनचंदला घेऊन बरेलीच्या उत्तरेला ५० कि. मी. वर असलेल्या पिलिभितला गेले. तेथे गेल्यानंतर त्याने तो सांगत असलेल्या सर्व गोष्टी बरोबर ओळखल्या.
- आणखीही काही नवीन विधाने तेथे त्याने केली. त्याने पूर्वजन्माविषयी केलेली एकूण ४८ विधाने असून त्याच्या मागच्या जन्मातील (लक्ष्मीनारायणच्या) व्यक्तिमत्वावर प्रकाश टाकणारी प्रमुख विधाने व ओळखी फक्त येथे देत आहे.

प्रमुख विधाने एकूण ४८ विधाने असून दोन सोडता सर्व बरोबर होती.

# बिशनचंदने  केलेली पुनर्जन्माविषयीची विधाने व ओळखी

- त्याचे गाव पिलिभीत. त्याचे नाव लक्ष्मीनारायण. वडिलांचे नाव हरनारायण. ते मोठे जमीनदार होते. तो कायस्थ होता.
- वडील हरनारायण त्याच्या (लक्ष्मीनारायणच्या) अगोदर वारले. त्यांच्या अंत्ययात्रेला फार मोठा जमाव होता. वडील त्याला नेहमी रेशमी वस्त्रे वापरायला देत असत.
- त्याचे शिक्षण सरकारी शाळेत सहावीपर्यंत झाले होते. तो उर्दू व इंग्रजी भाषा जाणत होता. त्याचे घर मोहल्लागंजमध्ये आहे.
- घराला दोन मजले आहेत. स्त्रियांना व पुरुषाना राहण्यासाठी घरात स्वतंत्र भाग आहेत. घरांत ठाकूरद्वार (पूजागृह) आहे. त्याचा माईकुआ नावाचा नोकर होता.

# त्याची पद्मा नावाची एक आवडती वेश्या होती.

- त्याने इस्माइल नावाच्या मुस्लिम व्यक्तीला घड्याळाचे दुकान घालून दिले. त्याला रोहू मासा खाण्यास आवडतो. (कायस्थ मांसाहारी आहेत)
- तो आपल्या घरी नाचणाऱ्या स्त्रियांचे नृत्य व गायन बैठका घेत असे. तो अविवाहित होता. त्याची पद्मा नावाची एक आवडती वेश्या होती.
- तिच्याबरोबर तो एकाच पेल्यात दारू पीत असे. एकदा त्याच्या एका प्रतिस्पर्ध्याला तिच्या खोलीतून बाहेर येताना पाहिले.
- त्या बरोबर त्याने सोबतच्या नोकराच्या हातातील बंदूक घेऊन त्याच्यावर गोळी झाडून त्याला ठार केले.
- नंतर तो एका(अज्ञात) ठिकाणी लपून बसला. तेथे त्याची आई त्याला जेवण पाठवीत असे.

## बिशनचंदने खजिन्याची ती खोली ओळखली. नंतर त्याच खोलीत खजीना सापडला. त्यात सोन्याची नाणी होती.

- काही दिवसानी तो शहाजानपूरला गेला. तेथे त्याने किरकोळ काम केले. तिथेच तो वारला. त्यावेळी त्याचे वय वीस वर्षाचे होते.
- पुनर्जन्माविषयी त्याने केलेल्या विधानापैकी फक्त दोन विधाने चुकीची ठरली आहेत. त्याचे घर मोहल्लागंजमध्ये आहे असे त्याने म्हटले आहे. त्याच्या घरापासून काही अंतरावर मोहल्लागंज असले तरी त्याचे घर मोहल्लासराईखान - मध्ये आहे. विसाव्या वर्षी आपण वारल्याचे त्याने म्हटले आहे. पण तो वयाच्या बत्तीसाव्या वर्षी वारला - बाकीची त्याची सर्व विधाने बरोबर ठरली आहेत.
- पिलिभीतमध्ये बिशनचंदने आपले घर ओळखले, आठ वर्षामध्ये घराची फार मोठी पडझड झाली होती. ती पाहून तो रडला. घरातील पूजागृह त्याने ओळखले, लक्ष्मीनारायणचे वडील हरनारायण यानी घरात खजीना पुरून ठेवला होता. मृत्यूपूर्वी ती जागा लक्ष्मीनारायणला त्यांनी सांगितली होती. पण लक्ष्मीनारायण कुणालाही त्याची माहिती न देता वारला होता. बिशनचंदने खजीन्याची ती खोली ओळखली. पण खोलीतील जागा तो सांगू शकला नाही. पण नंतर त्याच खोलीत खजीना सापडला. त्यात सोन्याची नाणी होती.

# मागच्या जन्मातील त्याची आवडती वेश्या पद्मा आपल्या गंगा या लहान बहिणीला घेऊन त्याला भेटायला आली.

- ❖ शेजारच्या त्याच्या नातेवाईकांने एक जुना फोटो आणला. त्यामध्ये हरनारायण कोण व लक्ष्मीनारायण कोण हे त्याने बोट ठेवून बरोबर ओळखले. एक तबल्याची जोडी आणण्यात आली. बिशनचंदने सराईतपणे तबला वाजवून दाखवला, बिशनचंदने आपल्या आयुष्यात तबला पाहिला ही नव्हता. असे त्याचे वडील बी. रामगुलाम यानी म्हटले आहे. ज्या इस्माइल नावाच्या मुस्लिमाला त्याने घड्याळाचे दुकान घालून दिले होते, ते दुकान बिशनचंदने ओळखले. इस्माइल मेला होता, त्या दुकानाचा मालक दुसरा कोणी होता.
- ❖ मागच्या जन्मातील त्याची आवडती वेश्या पद्मा आपल्या गंगा या लहान बहिणीला घेऊन त्याला भेटायला आली. बिशनचंदला ती म्हणाली, " तू आता लहान आहेस. मी वयस्कर झाले आहे”. बिशनचंद तिच्यापेक्षा वयानी लहान असलेल्या, पण लक्ष्मीनारायणच्या मृत्यूच्या वेळचे जे वय होते त्याच वयाच्या तिच्या बहिणीच्या मांडीवर जाऊन बसला!

# बिशनचंदचा आपल्या कुटुंबातील व्यवहार

- बी. रामगुलाम यांची परिस्थिती अतिशय गरीबीची होती. रेल्वेत कारकुनाची नोकरी करून ते आपला संसार चालवीत होते. बिशनचंद त्यांच्या गरीब परिस्थितीबद्दल त्यांना दोष देत असे. घरच्या अन्नाबद्दल तो म्हणे, “असले अन्न माझे नोकरही खात नाहीत”. खायला मटण मागे.
- बी रामगुलाम यांचे कुटुंब कट्टर शाकाहारी होते. ते त्याची इच्छा पुरवू शकत नव्हते. त्यामुळे संधी मिळेल तेव्हा तो शेजाऱ्याकडे जाऊन मटण खात असे.
- वडिलानी दिलेले सूती कपडे तो फाडून टाकी व रेशमी कपडे मागे. बी. रामगुलाम दारू पिणारे नव्हते. पण औषधासाठी घरी दारू ठेवली होती. ती कमी होत असल्याची त्याना आढळून आले. कमला या त्याच्या बहिणीने एकदा बिशनचंदला ती पीत असताना पकडले. यावेळी त्याचे वय चार ते साडेचार वर्षाचे होते, असे कमलाने सांगितले आहे.

# मी दारू व बायका यामध्ये पुरता बुडून गेलो होतो.

- ❖ बी.रामगुलाम यानी सांगितले की बिशनचंद एकदा त्यांना म्हणाला, “बाबा तुम्ही एक बाई का ठेवून घेत नाही? तिच्यामुळे तुम्हाला फार मोठे सुख मिळेल”.
- ❖ अत्यंत आश्चर्यचकित झालेले असतानाही स्वत:ला सावरून बी. रामगुलाम यानी त्याला विचारले,"कसले सुख बाळ?” बिशनचंद म्हणाला "तिच्या केसाच्या सुगंधाचे सुख तुम्हाला मिळेल. तिच्या संगतीचे फारच सूख तुम्हाला मिळेल”. यावेळी त्याचे वय पाच वर्षाचे होते व त्याला लग्नाची बायको व ठेवलेली बाई यांच्यातील फरक कळत होता. असे बी. रामगुलाम यांनी म्हटले आहे.
- ❖ पिलिभित गावाला त्याच्या कुटुंबाने दिलेल्या पहिल्या भेटीच्या वेळी जमलेल्या लोकात एक पोलीस सुपरिंटेंडेंट होता, तो बिशनचंदला म्हणाला होता, “आता तुझ्या बायको व मुलाविषयी सांग”. त्यावर बिशनचंद म्हणाला होता, “मला ते कोणी नव्हते. मी दारू व बायका यामध्ये पुरता बुडून गेलो होतो. लग्नाचा विचार मी केला नाही."

# बिशनचंदचा नंतरचा व्यक्तिविकास

❖ बिशनचंद सातव्या वर्षानंतर आपल्या पुनर्जन्माच्या गोष्टी पूर्ण विसरला. पण त्याच्या प्रतिस्पर्ध्याला ठार केल्याची गोष्ट मात्र तो विसरला नाही. ती गोष्ट तो अनेकदा अभिमानाने सांगे.

❖ लक्ष्मीनारायणाला डोळ्याचा थोडा दोष होता, बिशनचंदलाही तो दोष होता, लक्ष्मीनारायण बापाच्या श्रीमंतीमुळे व त्यानी (एकमेव पुत्र असल्याने) केलेल्या लाडामुळे पूर्ण बिघडला होता.

❖ शिक्षणाकडे त्याने पूर्ण दुर्लक्ष केले होते. बिशनचंदने मात्र दहावीपर्यंत शिक्षण घेतले. नंतर बापाच्या गरीब परिस्थितीशी जुळवून घेण्यास शिकला. पुढे अबकारी खात्यात त्याने नोकरी धरली व माफक प्रमाणात पैसे मिळवू लागला.

❖ पंचविसाव्या वर्षी त्याने लग्न केले, लग्नापूर्वी त्याने स्त्रियांशी लैंगिक व्यवहार केला होता. पण लक्ष्मीनारायणाप्रमाणे त्याचा अतिरेक केला नव्हता.

❖ मटण खाण्याचे व्यसन मात्र पत्नी कडक शाकाहारी असल्यामुळे त्याला बाहेर रेस्टॉरंटमध्ये भागवावे लागे.

## दारूचे व्यसन मात्र त्याने केले नाही. तथापि लग्नापूर्वी वयाच्या तेविसाव्या वर्षी अशी एक घटना घडली की जिच्यामुळे पूर्वजन्मातील सुप्त स्वरुपात असलेले व्यसनाचे संस्कार प्रसंगोपात्त कसे उफाळून येतात हे कळून येते. ती घटना अशी:

- ❖ पिलिभितपासून उत्तरेला ऐंशी किमी. अंतरावर तनकपूर या शहरातील सेंट्रल एक्साइज ऑफीसात तो काम करीत होता. एकदा पद्मा काही स्त्रियासह ऑफीसमध्ये आली, (त्यावेळी तिचे वय बावनच्या आसपास असावे) बिशनचंदला साडेपाच वर्षांचा असताना पिलिभितमध्ये प्रथम ती भेटली. होती त्यानंतर त्याने तिला कधी पाहिले नव्हते. तथापि त्याने तिला ओळखले व विचारले,
- ❖ “तू पद्मा काय?" तिने "होय"म्हटले. लगेच त्याने तिला मिठी मारली.पण भावनातिरेकामुळे तो बेहोश झाला. त्या काळी पद्मा तनकपुरापासून तीन कि.मी. अंतरावरील नैकोट या खेड्यात राहत होती. त्याच दिवशी संध्याकाळी बिशनचंद दारूची एक बाटली घेऊन तिच्याशी आपला सव्वीस वर्षापूर्वीचा संबंध पुन्हा स्थापित करण्याच्या इराद्याने तिच्या घरी गेला.
- ❖ तिने त्याला पाहताच खडसावले,"मी आता तुझ्या आईप्रमाणे वृद्ध आहे, मागच्या जन्मी सर्व संपत्ती तू घालवून बसलास. परत या जन्मीही तसेच घालवू इच्छितोस काय?" असे म्हणून त्याची दारूची बाटली फोडली व त्याला घरातून हाकलून दिले.

# लक्ष्मीनारायणला आठवणारा त्याचा मागचा जन्म बिशनचंदला मात्र आठवत नव्हता.

- डॉ.इयान स्टिव्हन्सन या जागतिक पुनर्जन्म संशोधकांनी बिशनचंदची नंतर भेट घेऊन त्याच्यात झालेल्या व्यक्तीविकासाचा शोध घेतला. तेव्हा त्यांना आढळून आले की मागच्या जन्मातील श्रीमंतीपणाच्या वागणुकीचे व त्यातून त्याने केलेल्या खुनाचे फल म्हणून आपला गरीब कुटुंबात जन्म झाल्याचे तो मानत होता. भौतिक साधनसंपत्ती व शारीरिक भोग यामुळे मनुष्य सुखी होत नाही, हे त्याला कळल्याचेही त्याच्या उपस्थितीत आपणाला जाणवले असल्याचे स्टिव्हन्सन यांनी म्हटले आहे.
- लक्ष्मीनारायणचे मातुल उपेंद्रनारायण यांनी सांगितले की लक्ष्मीनारायणला वयाच्या सहाव्या वर्षापर्यंत आपला मागचा जन्म आठवत होता. तो आपला मागचा जन्म जहानाबाद येथे झाल्याचे सांगत असे. (जहानाबाद नावाचे शहर बिहारमध्ये आहे.) पण प्रसिध्दीमुळे त्याचे जीवन धोक्यात येईल या भीतीने ती गोष्ट वडील हरनारायण यांनी गुप्त ठेवली. लक्ष्मीनारायणला आठवणारा त्याचा मागचा जन्म बिशनचंदला मात्र आठवत नव्हता.
- (Cases of Reincaternation Type, vol. I Ian Stevenson, 1975 Pp. 176-205)




# अलेक्झांड्रिना सामोना




- सिसिली (इटली) येथील पार्लेमो या शहरातील डॉक्टर कार्मेलो समोना यांनी अलेक्झांड्रिना या आपल्या मुलीच्या पुनर्जन्माचे हे प्रकरण सर्व साक्षी पुराव्यानिशी १९१० च्या दशकात इटलीच्या 'फिलासोफिया डेला सायन्झा' या नियतकालिकात प्रसिद्ध केले आहे.
- डॉक्टर सामोना यांची मुलगी अलेक्झांड्रिना १५ मार्च १९१० रोजी पाच वर्षे वयाची असताना वारली. मृत्यूच्या तीन दिवसानंतर त्यांची पत्नी अडेला सामोना हिच्या स्वप्नात ती मुलगी येऊन म्हणाली,"आई तू रडू नकोस. मी तुला सोडलेली नाही.थोडी दूर गेलेय इतकेच.
- पाहा, मी पुन्हा अशी बनेल." असे म्हणून तिने एक अर्भक दाखवले आणि म्हणाली, “त्यामुळे पुन्हा तुला माझ्यामुळे थोडा त्रास सोसावा लागेल" तीन दिवसानंतर अडेलाला पुन्हा तेच स्वप्न पडले.
- अडेला समोनाने हे स्वप्न आपल्या मैत्रिणीला सांगितले. तेव्हा मैत्रिण तिला म्हणाली, "अलेक्झांड्रिना तूझ्या पोटी जन्म घेणार आहे”.
- पण तिचा त्या गोष्टीवर विश्वास बसला नाही. कारण तिने स्वत:चे संततिनियमनाचे ऑपरेशन करून घेतले होते. त्यामुळे तिला मुले होणार नव्हती.

# सामोना पतीपत्नीनी मृतात्म्यांची कौटुंबिक बैठक (सीअन्स) घेण्याचे ठरविले. त्या बैठकीत माध्यमाद्वारे दोन मृतात्मे प्रकट झाले.

- ❖ काही दिवसानंतर अडेला सामोना आपल्या पतीसमोर अलेक्झांड्रिना गेल्याबद्दल दु:ख व्यक्त करीत असताना तीन गूढ ठोक्यांचा मोठा आवाज त्यांना ऐकायला आला. तेव्हा सामोना पतीपत्नीनी मृतात्म्यांची कौटुंबिक बैठक (सीअन्स) घेण्याचे ठरविले.त्या बैठकीत माध्यमाद्वारे दोन मृतात्मे प्रकट झाले. एक मृतात्मा अलेक्झांड्रिना हिचा होता व दुसरा तिच्या आत्याचा, जी काही वर्षापूर्वी वारली होती. अलेक्झांड्रिनाच्या मृताम्याने अडेलाला आपण स्वप्नात तिला भेटल्याचे सांगितले.
- ❖ तीन ठोक्यांचा मोठा आवाज आपणच केला होता असेही त्याने सांगितले. अलेक्झांड्रिनाच्या मृतात्म्याने पुढे अडेलाला असेही सांगितले की नाताळपूर्वी मी तुझ्या पोटी जन्म घेणार असून आपल्या बरोबर  माझ्या आत्याला जुळ्या बहिणींच्या रूपात घेऊन येणार आहे. ही गोष्ट सर्व नातेवाईकांना व मित्रमैत्रिणीना तू जाहीरपणे सांग.
- ❖ २२ नोव्हेंबर १९१० रोजी अडेला समोनाने जुळ्या मुलीना जन्म दिला. त्यातील एक अलेक्झांड्रिनाच्या तोंडावळ्याची होती. म्हणून तिचे  अलेक्झांड्रिना हेच नाव ठेवले. दुसरीचे शारीरिक स्वरूप अगदीच भिन्न होते. अलेक्झांड्रिना-१ ला डाव्या डोळ्याचा व उजव्या कानाचा दोष होता. अलेक्झांड्रिना - २ मध्येही त्याच अवयांचा तोच दोष आढळून आला.
- ❖ अलेक्झांड्रिना -२ च्या चेह-याची ठेवण अलेक्झांड्रिना - १ च्या चेहऱ्याप्रमाणेच असमान होती. आवडीनिवडी व  स्वभाववैशिष्ट्य यामध्येही दोघीमध्ये पूर्ण साम्य होते. मोठी झाल्यानंतर अलेक्झांड्रिना -१ शी संबंधित पूर्वजन्मातील घटनांचे वर्णन अलेक्झांड्रिना-२ ने अगदी अचूक केल्याचे तिच्या आईला आढळून आले.

- (The Belief in a Life After Death-C.J.-Ducasse, 1974-Pp-244-5)

- चार्ल्स रॉबर्ट डार्विन (१८०९-१८८२) हे इंग्लिश निसर्गशास्त्रज्ञ, भूगर्भशास्त्रज्ञ आणि जीवशास्त्रज्ञ होते. उत्क्रांतीवादी जीवशास्त्रातील क्रांतिकारक योगदानासाठी ते सर्वत्र प्रसिद्ध आहेत. सर्व जीवसृष्टी एका सामान्य पूर्वजापासून उत्पन्न झाल्याचा त्यांचा मूलभूत सिद्धांत आता वैज्ञानिक समज 1. डार्विनच्या आकर्षक जगाचा शोध घेऊया:
- निसर्गात लवकर स्वारस्य:
- डार्विनच्या निसर्गाच्या आवडीमुळे त्याला एडिनबर्ग विद्यापीठातील वैद्यकीय शिक्षणाकडे दुर्लक्ष केले. त्याऐवजी, त्याने सागरी अपृष्ठवंशी प्राण्यांचा शोध लावला आणि वैज्ञानिक तपासणी केली.
- युनिव्हर्सिटी ऑफ केंब्रिजच्या क्राइस्ट कॉलेजमधील त्यांच्या अभ्यासामुळे त्यांचे नैसर्गिक विज्ञानाबद्दलचे प्रेम आणखी वाढले.
- बीगलचा प्रवास:
- 1831 ते 1836 पर्यंत, डार्विनने एचएमएस बीगलवर पाच वर्षांचा प्रवास केला. या प्रवासाने त्यांना एक प्रख्यात भूगर्भशास्त्रज्ञ म्हणून प्रस्थापित केले.
- त्याच्या निरीक्षणे आणि सिद्धांतांनी चार्ल्स लायलच्या हळूहळू भूवैज्ञानिक बदलाच्या संकल्पनेला समर्थन दिले.
- प्रवासातून त्याच्या जर्नलच्या प्रकाशनाने डार्विनला लोकप्रिय लेखक बनवले.

Biology 13.1 Theory of Natural Selection

Theory of Natural Selection

- काही समीक्षकांचा असा युक्तिवाद आहे की उत्क्रांतीची प्रक्रिया प्रत्यक्षपणे पाहिली गेली नाही आणि म्हणूनच ती सैद्धांतिक राहते.

- तथापि, हे ओळखणे आवश्यक आहे की उत्क्रांती दीर्घ कालावधीत होते, ज्यामुळे थेट निरीक्षण आव्हानात्मक होते. त्याऐवजी, आम्ही अप्रत्यक्ष पुराव्यावर अवलंबून असतो, जसे की जीवाश्म नोंदी आणि अनुवांशिक अभ्यास.